सन २०१९-२० या वित्तीय वर्षासाठी महिला आर्थिक विकास महामंडळास निधी वितरीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**महिला व बाल विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांक-माविम-२०१९/प्र.क्र.६२/का-१०**

नविन प्रशासन भवन, तिसरा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख-२० मार्च, २०२०.

वाचा :-

१. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०१९/प्र.क्र.४४/अर्थ-३, दि.१ एप्रिल, २०१९.
२. शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग, क्र.माविम-२०१९/प्र.क्र.६२/का-१०, दि.९ जुलै, २०१९.
३. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दि.८ जुलै, २०१९.
४. शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग, क्र.माविम-२०१९/प्र.क्र.६२/का-१०, दि.७ जानेवारी, २०२०.
५. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दि.१३ मार्च, २०२०.

प्रस्तावना :-

वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.१ येथील दि.१.४.२०१९ रोजीच्या परिपत्रकानुसार सन २०१९-२० या वित्तीय वर्षासाठी विभागास उपलब्ध करण्यात आलेले लेखानुदान विचारात घेता, २२३५-१३१६ या संगणक संकेतांकाखाली ३६ सहायक अनुदाने (वेतन) या बाबीसाठी अर्थसंकल्पीय तरतूद ₹२४,४५,६१,०००/- (अक्षरी रुपये चोवीस कोटी पंचेचाळीस लक्ष एकसष्ट हजार फक्त) पैकी ₹८,१५,००,०००/- (अक्षरी रुपये आठ कोटी पंधरा लक्ष फक्त) इतका निधी संदर्भाधीन क्र.२ येथील दि.९.७.२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.३ येथील दि.८.७.२०१९ रोजीच्या परिपत्रकानुसार ₹६,५२,३६,६००/- (अक्षरी रुपये सहा कोटी बावन्न लक्ष छत्तीस हजार सहाशे फक्त) इतका निधी संदर्भाधीन क्र.४ येथील दि.७.१.२०२० रोजीच्या शासन निर्णयान्वये महिला आर्थिक विकास महामंडळास वितरीत करण्यात आला आहे.

२. वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.५ येथील दि.१३.३.२०२० रोजीच्या परिपत्रकानुसार सन २०१९-२० या वित्तीय वर्षासाठी २२३५-१३१६ या संगणक संकेतांकाखाली ३६ सहायक अनुदाने (वेतन) बाबीसाठी निश्चित करण्यात आलेले सुधारित अंदाज ₹१८,००,००,०००/- (अक्षरी रुपये अठरा कोटी फक्त) च्या मर्यादेत अवितरीत तरतूद ₹३,३२,६३,४००/- (अक्षरी रुपये तीन कोटी बत्तीस लक्ष त्रेसष्ट हजार चारशे फक्त) इतका निधी महिला आर्थिक विकास महामंडळास वितरीत करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

शासन निर्णय :-

वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.५ येथील दि.१३.३.२०२० रोजीच्या परिपत्रकानुसार सन २०१९-२० या वित्तीय वर्षासाठी निश्चित करण्यात आलेले सुधारित अंदाज विचारात घेता, २२३५-१३१६ या संगणक संकेतांकाखाली ३६ सहायक अनुदाने (वेतन) या उद्दिष्टाकरिता **₹३,३२,६३,४००/- (अक्षरी रुपये तीन कोटी बत्तीस लक्ष त्रेसष्ट हजार चारशे फक्त)** इतका निधी महिला आर्थिक विकास महामंडळास वितरीत करण्यास याव्दारे शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर निधी महिला आर्थिक विकास महामंडळास वितरीत करण्यासाठी जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी, मुंबई उपनगर यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णयान्वये तसेच यापूर्वी वितरित करण्यात आलेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करण्याची दक्षता व्यवस्थापकीय संचालक, महिला आर्थिक विकास महामंडळ, बांद्रा, मुंबई यांनी घ्यावी.

४. जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी, मुंबई उपनगर यांच्या सहीने तयार केलेले व उपसचिव, महिला व बाल विकास विभाग यांनी प्रतिस्वाक्षरी केलेले देयक अधिदान व लेखा अधिकारी यांना सादर करावे. अधिदान व लेखा अधिकारी यांनी सदर देयकातील मंजूर रक्कम धनादेशाव्दारे अदा करावी. उपसचिव, महिला व बाल विकास विभाग यांना जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी, मुंबई उपनगर यांनी सादर केलेल्या देयकावर प्रतिस्वाक्षरी करण्याचे अधिकार दिलेले आहेत.

५. सदर रक्कम मागणी क्र.एक्स-१, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण ०२ समाजकल्याण १०३, महिला कल्याण, (०३) इतर योजना, (०३) (०१) महिला आर्थिक विकास महामंडळ (२२३५ १३१६) (महिला सक्षमीकरण), (कार्यक्रम), ३६ सहायक अनुदाने (वेतन) या लेखाशीर्षाखाली सन २०१९-२० मध्ये उपलब्ध करुन देण्यात आलेल्या तरतूदीतून खर्च करण्यात यावी.

६. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या क्र.अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दि.८ जुलै, २०१९ रोजीच्या परिपत्रकातील परिच्छेद क्र.४ ते १९ मधील मार्गदर्शक सूचना व त्या विभागाने दिलेल्या सहमतीस अनुसरुन तसेच वित्त विभागाच्या क्र.अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दि.१३ मार्च, २०२० रोजीच्या परिपत्रकास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२००३२०१६५५१३९२३० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAVINDRA SITARAM JARANDE

Digitally signed by RAVINDRA SITARAM JARANDE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=186d0f0fdd27c79b9b3f859a90ec537946c37d5876e64ce525d082e58e494c85, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBA, serialNumber=4d2dc3dbd5c0f35a66a84c93b4cead367c64cc2bc9d7391e9a053988a2f81b64, ou=WOMEN AND CHILD DEVLOPMENT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=RAVINDRA SITARAM JARANDE
Date: 2020.03.20 16:56:58 +05'30'

(र.सि.जरांडे)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
२. व्यवस्थापकीय संचालक, महिला आर्थिक विकास महामंडळ, बांद्रा (पूर्व), मुंबई-५१
३. महालेखापाल- महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर
४. महालेखापाल- महाराष्ट्र-१/२ (लेखा परिक्षा), मुंबई / नागपूर
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
६. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
७. जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी, मुंबई उपनगर
८. नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
९. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. अवर सचिव (अर्थसंकल्प), महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांना सदर निधी बी.डी.एस. प्रणालीवर वितरीत करण्याच्या विनंतीसह अग्रेषित.
११. निवड नस्ती, का-१०.